वान मोठा प्रकल्प ता. तेल्हारा, जि. अकोला
विशेष दुरुस्ती/विस्तार व सुधारणा अंतर्गत
प्रशासकीय रद्द करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा-२०१७/(५२३ /२०१७)/सिं.व्य.(कामे)**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १५.११.२०१८.**

वाचा :-

१. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे -
  i) पत्र क्र.९३०७/विपाविम/कांता-७(२)/पूर्णा बॅरेज (५०२/२०१६)/२०१७, दि.१०/१०/२०१७.
  ii) पत्र क्र. ६२४९/विपाविम/कांता-७(२)/पलढग म प्र/(१३/२०१८)/२०१८,दि. २२/०६/२०१८.
२. शासन निर्णय संकीर्ण- २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.
३. शासन निर्णय क्र. प्रमा- २०१७/(५२३/२०१७)/सिंव्य(कामे), दि.०४.०१.२०१८.

**प्रस्तावना -**

वान मोठा प्रकल्प , ता.तेल्हारा, जि. अकोला या प्रकल्पाच्या विशेष दुरुस्ती/ विस्तार व सुधारणा अंतर्गत रु.४८८.४५ लक्ष मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च विस्तार व सुधारणा / विशेष दुरुस्ती (योजनांतर्गत) संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यतेची कार्यवाही सुरु असतांना सदर काम वान प्रकल्पाच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेतंर्गत उर्वरित किंमतीतून करण्यास महामंडळाने मान्यता दिली आहे. तसेच विषयांकित प्रकरणी महाराष्ट्र विधानसभा उन्हाळी अधिवेशन -२०१७ मध्ये मा.मंत्री जलसंपदा यांनी पलढग प्रकल्पाची दुरुस्ती विशेष दुरुस्ती अंतर्गत करण्याचे आश्वासन दिले आहे. त्यानुषंगाने सदर आश्वासनाची पूर्तता करण्यासाठी प्रादेशिक कार्यालयाने विशेष दुरुस्ती,विस्तार व सुधारणा अंतर्गत वान प्रकल्प, ता.तेल्हारा, जि.अकोला या कामास प्राप्त प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत संदर्भिय प्र.क्र. (१)ii अन्वये प्रस्ताव सादर केला आहे. याबाबत सर्व बाबींचा विचार करुन संदर्भिय क्र.३ अन्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता शासनाने संदर्भिय क्र.३ अन्वये दिलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे. त्यामुळे या प्रशासकीय मान्यतेतंर्गत या पुढे कुठलाही खर्च होणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११५१४५५११९९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.11.15 14:57:47 +05'30'

**(अ. अ. कपोले)**
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा.विरोधीपक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती.
१५. आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. अधीक्षक अभियंता, अकोला सिंचन मंडळ, अकोला
१७. कार्यकारी अभियंता, अकोला पाटबंधारे विभाग, अकोला.
१८. सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.